आयुक्त, राज्य लॉटरी यांना “विभाग प्रमुख” घोषित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०२२/प्र.क्र.१८७/लॉटरी-३.

राज्य लॉटरी संचालनालय, ८ वा मजला, नवीन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०१ मार्च, २०२३

**प्रस्तावना :**

वित्त विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील अल्पबचत संचालनालयाचे कामकाज कमी झाल्याने मंत्रिमंडळाच्या दि.१०/१०/२०१७ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार, अल्पबचत संचालनालय कायमस्वरुपी बंद करण्यात आले. अल्पबचत संचालनालय कायमस्वरुपी बंद करण्यात आल्यानंतर अल्पबचत संचालनालयाच्या आस्थापनेवरील पदांबाबत/कर्मचाऱ्यांबाबत घेण्यात आलेल्या, मा.मुख्य सचिव, यांच्या अध्यक्षतेखालील दि.२६/१०/२०१७ रोजीच्या उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीतील निर्णयानुसार, अल्पबचत संचालनालयाच्या आस्थापनेवरील सातव्या वेतन आयोगानुसार रु.१,४४,२००/- वेतनश्रेणीतील आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी हे पद, महाराष्ट्र राज्य लॉटरी संचालनालयाच्या आस्थापनेवर आयुक्त, राज्य लॉटरी या पदनामाने अस्थायी पद म्हणून वर्ग करण्यात आले.

महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण अटी) नियम, १९८१ मधील नियम ९(२२) अन्वये, “परिशिष्ट-दोन” मध्ये उल्लेखिलेले अधिकारी आणि शासन वेळोवेळी विभाग प्रमुख म्हणून घोषित करील असे इतर कोणतेही अधिकारी यांचा “विभाग प्रमुख” या संज्ञेमध्ये समावेश होतो”, असे नमूद केले आहे. त्यानुसार परिशिष्ट-दोन मध्ये महाराष्ट्र नागरी सेवा नियमांच्या प्रयोजनासाठी “विभाग प्रमुख” म्हणून मानावयाच्या अधिकाऱ्यांच्या यादीमध्ये, अनु.क्र.२१ च्या उप क्र.१७ वर “आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी”, हे विभाग प्रमुख असल्याचे नमूद आहे. सदर पदनामामध्ये बदल करून “आयुक्त, राज्य लॉटरी” यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:

वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ च्या भाग-पहिला, उपविभाग-एक मध्ये नमूद केल्यानुसार एखाद्या अधिकाऱ्याला "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करण्यास प्रशासनिक विभाग सक्षम आहे. सदर अधिकाराचा वापर करून अप्पर मुख्य सचिव (ले.व को.) यांच्या मान्यतेने "आयुक्त, राज्य लॉटरी" यांना महाराष्ट्र नागरी सेवा नियमांच्या प्रयोजनासाठी, महाराष्ट्र राज्य लॉटरी संचालनालयाचे "विभाग प्रमुख" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२३०३०३११४१२८८७०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

KAMALAKAR SITARAM BADGUJAR

Digitally signed by KAMALAKAR SITARAM BADGUJAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=51a947cca196d0cc41c310e8c0d21cc8c2c6cbbacabc7bbc587512dd9efe3326, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A25EDCEC358CA4AE26F3EED03117EAB6556EB316F260CA73B83104BD225AEF69, cn=KAMALAKAR SITARAM BADGUJAR
Date: 2023.03.03 11:46:16 +05'30'

**( क. सिं. बडगुजर )**
उपसंचालक राज्य लॉटरी तथा
अवर सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) अपर मुख्य सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव वित्तीय सुधारणा/ व्यय/विनियम, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, राज्य लॉटरी, राज्य लॉटरी संचालनालय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई .
७) कोषागार अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई .
९) वित्त विभाग, प्रशासन-१,
१०) निवड नस्ती, लॉटरी-३.